बाजारमुल्य दर तक्त्यांचे सुक्ष्म पातळीवर समग्र पुनर्विलोकन (Micro Planning) व अनुषंगिक पदनिर्मितीबाबत...

## महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः आस्थापना-२०१२/४३७/प्र.क्र.१७०/म-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
तारीख: १० एप्रिल, २०१५.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आस्थापना-१०८८/प्र.क्र.४५०/म-१,दि.२९/९/१९८८.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.मुद्रांक-१०९४/प्र.क्र.५३७/म-१,दि.१८/८/१९९५.

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आस्थापना-२००१/प्र.क्र.२९८/म-१,दि.३०/११/२००२.

**प्रस्तावना :-**

राज्यातील स्थावर मालमत्तेचे बाजारमूल्य निश्चित करण्यासाठी नोंदणी विभागामध्येकार्यक्षम स्वतंत्र यंत्रणा उपलब्ध नसल्याने मालमत्तेचे रास्त बाजारमूल्य निश्चित करणेसाठी क्र.१ च्या शासन निर्णया अन्वये सहसंचालक, नगर रचना, मूल्यांकन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिपत्याखाली ४ प्रादेशिक कार्यालये निर्माण करुन त्यामध्ये ६३ पदांची निर्मिती केली होती. त्यानंतर क्र.२ व ३ च्या शासन निर्णयान्वये आणखी ३ प्रादेशिक कार्यालये निर्माण करुन त्यामध्ये ३९ पदांची निर्मिती करण्यात आली होती. सद्यस्थितीत सहसंचालक, नगर रचना या राज्यस्तरीय कार्यालयासह ७ प्रादेशिक कार्यालयामध्ये एकूण १०२ पदे मंजूर आहेत.

सदर मूल्यांकन कार्यालये निर्माण करण्यात आली, त्यावेळी सन १९८९-१९९० मध्ये नोंदणीकृत दस्तसंख्या ७२२३०७ व महसूल रु.२५६.४५ कोटी इतका होता. सद्यस्थितीत सन २०१३-१४ मध्ये नोंदणीकृत दस्तसंख्या २३,३०,३७३ व महसूल रु.१८६६६ कोटी इतका आहे. दस्तसंख्येमध्ये तीनपट तर महसूलामध्ये ७२ पट इतकी भरीव वाढ झाली. दस्तसंख्येच्या तुलनेत महसूलातील वाढ ही वास्तववादी बाजारमूल्य दर तक्त्यातील दरामुळेच झाली आहे. मात्र सदर दर तक्ते तयार करण्यासाठीच्या कर्मचारी वृंदामध्ये दुपटीपेक्षाही कमी वाढ झाली आहे.

सर्व शासकीय/ निमशासकीय विभाग/ महानगरपालिका/ नगरपरिषद अलीकडच्या काळात विविध कारणासाठी उदा. आयकर आकारणी, मिळकतकर आकारणी, प्रिमिअम, विकास शुल्क, शासकीय जमीन मूल्य निश्चित करणे इ. साठी वार्षिक मूल्य दर तक्त्याचा वापर करीत असल्यामुळे अधिक वास्तववादी व अचूक बाजारमूल्य दर तक्ते तयार करण्याबाबत नागरिकांची मागणी व दबाव वाढत आहे.

दस्त संख्येत झालेली वाढ, राज्यात प्रचंड वेगाने होणारे नागरीकरण,उभारण्यात येणारे मोठे प्रकल्प इ. लक्षात घेता उपलब्ध कर्मचारीवृंदामध्ये वाढ करणे आवश्यक आहे. तसेच बाजारमूल्य दर तक्ते सूक्ष्म पातळीवर करण्यासाठी (Micro Planning) पथदर्शी प्रकल्प बृहन्मुंबई, ठाणे व पुणे महानगरपालिका हद्दीतील प्रत्येकी एका गावासाठी असा पथदर्शी प्रकल्प झाल्यानंतर त्याचे मूल्यमापन करुन सर्व महानगरपालिका क्षेत्रामध्ये टप्प्याटप्प्याने असा प्रकल्प हाती घेता येईल. सदर प्रकल्पामुळे सॅटेलाईट इमॅजरी व भौगोलिक माहिती प्रणाली (GIS) आधारे प्रत्येक मिळकतीचे गुणदोषानुसार सविस्तर व अचूक दर प्रस्तावित करणे शक्य असल्यामुळे पर्यायाने शासन महसूलात वाढ होईल व नागरिकांच्या तक्रारीही कमी होऊ शकतील. त्याअनुषंगाने विविध संवर्गातील आवश्यक ती ३७ नवीन पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासन स्तरावर विचाराधीन होता. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

१) राज्यस्तरीय कार्यालय व ७ विभागीय कार्यालयामध्ये अस्थायी स्वरुपातील २२ नवीन पदे निर्माण करण्यात येत आहेत. त्याचा तपशील सोबतच्या सहपत्र क्र.१ मध्ये देण्यात आला आहे.

२) वार्षिक मूल्यदर तक्ते सूक्ष्म पातळीवर करणेसाठी बृहन्मुंबई, ठाणे व पुणे येथे पथदर्शी प्रकल्पासाठी प्रथमत: २ वर्षासाठी तात्पुरत्या स्वरुपात १५ नवीन पदे निर्माण करण्यात येत आहेत. त्याचा तपशील सोबतच्या सहपत्र क्र.२ मध्ये देण्यात आला आहे. सदरची कार्यालये बृहन्मुंबई, कोकण विभाग व पुणे विभागीय प्रादेशिक मूल्यांकन कार्यालयास संलग्न राहतील.

३) संबंधीत विभागाने आपल्या आस्थापनेवरील उक्तप्रमाणे नव्याने निर्माण होणारी पदे ही स्थायी संवर्गात तात्पुरती म्हणून गणली जातील. सदर पदे नगर रचना संचालनालयाच्या आस्थापनेवरुन भरण्याबाबतची कार्यवाही करावी व वि.विध संवर्गातील सदर पदांचा समावेश मुळ आकृतीबंधामध्ये करुन सुधारीत आकृतीबंध मंजूरीस्तव शासनास सादर करावा.

४) सदर प्रस्ताव हा नवीन बाब ठरत असल्याने वेतनावर होणाऱ्या खर्च संदर्भात पूरक मागणी प्रस्ताव नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास स्वतंत्रपणे सादर करावा. तसेच सदर पदास प्रत्येक आर्थिक वर्षाकरीता शासनाकडून मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

५) हे आदेश उच्च स्तरीय सचिव समितीने दि.२८/११/२०१४ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१०१५०९२३४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: CN = Dinesh Rohidas Chavan, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.04.10 15:19:32 +05'30'

**दिनेश चव्हाण**
कक्ष अधिकारी

**प्रति,**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे

**प्रत,**

१) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
२) महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
३) अपर मुद्रांक नियंत्रक, प्रधान मुद्रांक कार्यालय, मुंबई
४) संबंधित जिल्हाधिकारी तथा जिल्हा निबंधक
५) सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७) संबंधित सर्व सह जिल्हा निबंधक वर्ग-१
८) वित्त विभाग (व्यय-१०/वि.सु.-१), मंत्रालय, मुंबई-३२
९) निवडनस्ती, म-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आस्थापना-२०१२/४३७/प्र.क्र.१७०/म-१ दि.०४ मार्च, २०१५ चे सहपत्र क्र.१

**सहसंचालक, नगर रचना, मूल्यांकन, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयात नव्याने निर्माण करण्यात यावयाच्या पदांचा तपशील :-**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी | नवनिर्मित पदे कशी भरली जाणार आहेत. |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक नगर रचनाकार | ३ | ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००/- | नगर रचना विभागाकडून प्रतिनियुक्तीने |
| | **एकूण** | **३** | | |

**उपसंचालक, नगर रचना, मूल्यांकन, मुंबई प्रदेश, मुंबई या कार्यालयात नव्याने निर्माण करण्यात यावयाच्या पदाचा तपशील :-**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी | नवनिर्मित पदे कशी भरली जाणार आहेत |
|---|---|---|---|---|
| १ | अनुरेखक | १ | ५२००-२०२००, ग्रेड पे २०००/- | नगर रचना विभागाकडून प्रतिनियुक्तीने |
| | **एकूण** | **१** | | |

**सहायक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे, कोकण, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर या ६ विभागीय मूल्यांकन कार्यालयात नव्याने निर्माण करण्यात यावयाच्या पदांचा तपशील :-**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी | नवनिर्मित पदे कशी भरली जाणार आहेत. |
|---|---|---|---|---|
| १ | सहायक नगर रचनाकार | २ पदे प्रत्येकी | ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००/- | नगर रचना विभागाकडून प्रतिनियुक्तीने |
| २ | अनुरेखक | १ पद प्रत्येकी | ५२००-२०२००, ग्रेड पे २०००/- | |
| | **एकूण** | **१८** | | |

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.आस्थापना-२०१२/४३७/प्र.क्र.१७०/म-१ दि.०४ मार्च, २०१५ चे सहपत्र क्र.२

पथदर्शी प्रकल्पासाठी बृहन्मुंबई, ठाणे व पुणे महानगरपालिकांसाठी तात्पुरत्या स्वरुपात २ वर्षांसाठी निर्माण करावयाच्या तात्पुरत्या पदांचा तपशील :-

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी | नवनिर्मित पदे कशी भरली जाणार आहेत. |
|---|---|---|---|---|
| १ | नगर रचनाकार | १ पद प्रत्येकी | ९३००-३४८००, ग्रेड पे ५०००/- | नगर रचना विभागाकडून प्रतिनियुक्तीने |
| २ | सहायक नगर रचनाकार | २ पदे प्रत्येकी | ९३००-३४८००, ग्रेड पे ४३००/- | |
| ३ | कनिष्ठ आरेखक | २ पदे प्रत्येकी | ९३००-३४८००, ग्रेड पे ४२००/- | |
| | **एकूण** | **१५** | | |